**गोंदिया येथील नाटयगृह इमारतीच्या बांधकामासाठी तिसऱ्या हफ्त्यापैकी उर्वरीत अर्थसहाय्य वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०११/प्र.क्र.४२/सां.का.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u> : १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक नागृबा-२०१०/प्र.क्र.३२१/सां.का.१, दि.१४.०१.२०११.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक नागृबा-२०११/प्र.क्र.४२/सां.का.१, दि.१४.१०.२०११.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक नागृबा-२०११/प्र.क्र.४२/सां.का.१, दि.२५.११.२०१४.
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक नागृबा-२०११/प्र.क्र.४२/सां.का.१, दि.२८.०३.२०१८.

**<u>प्रस्तावना</u> :**

शासन निर्णय दि.१४.१०.२०११ अन्वये गोंदिया जिल्हा मुख्यालयी ८१० आसन क्षमतेच्या नाटयगृह बांधकामाच्या रु.१०,७६,५८,२८७/- एवढया रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार गोंदिया नाटयगृह बांधकामाकरीता पहिला हप्ता म्हणून रु.१.५० कोटी इतके अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले. तसेच शासन निर्णय दि.२५.११.२०१४ अन्वये पहिल्या हप्त्याची उर्वरीत रक्कम रु.३०.०० लाख व दुसऱ्या हप्त्याचे रु.२.२५ कोटी असे एकूण रु.२.५५ कोटी एवढे अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले होते. तद्नंतर शासन निर्णय दि.२८.०३.२०१८ अन्वये तिसऱ्या हप्त्याचे रु.४.०० कोटी एवढे अर्थसहाय्य वितरीत करण्यात आले आहे. शासनाने वितरीत केलेल्या रु.८.०५ कोटी अर्थसहाय्यापैकी रु.७.०० कोटी एवढा निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागास प्राप्त झाले आहे. शासन हिश्श्याचा तिसरा हप्त्याचा उर्वरीत हिस्सा रु.९५.०० लक्ष वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :

या शासन निर्णयान्वये गोंदिया येथे नाटयगृह इमारतीचे बांधकामासाठी शासकीय अर्थसहाय्याच्या तिसऱ्या हप्त्याचा उर्वरीत हिस्सा **रु.९५,००,०००/- (रुपये पंच्याण्णव लक्ष फक्त)** वितरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या तिसऱ्या हप्त्याचा उर्वरीत हिस्सा रक्कम रु.९५,००,०००/- खर्च केल्याचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र तसेच कामाचे भौतिक साध्य याबाबतची माहिती सादर करणे बंधनकारक राहील.
२) शासन निर्णय दि.१४ ऑक्टोबर, २०११ अन्वये विहित केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पालन करणे नगर परिषद, गोंदिया व जिल्हाधिकारी, गोंदिया यांना बंधनकारक राहिल.
३) जिल्हा मुख्यालयी नाटयगृह बांधकाम योजनेबाबत शासन निर्णय दि.२९.०२.२०१६ मधील विहीत सर्व अटी व शर्तींचे पालन करणे गोंदिया नगरपरिषदेला बंधनकारक राहील.

४) नाटयगृह बांधकामाचे भौतिक साध्य व सद्यस्थिती जिल्हाधिकारी, गोंदिया यांचे मार्फत शासनाला सादर करणे मुख्याधिकारी नगर परिषद, गोंदिया यांना बंधनकारक राहील.

५) जिल्हाधिकारी, गोंदिया यांनी नाटयगृहाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर संपुर्ण खर्चाचा हिशोब व ताळेबंद सनदी लेखापाल यांच्या प्रमाणपत्रासह या विभागास सादर करावा.

६) शासनाच्या वापरासाठी नाटयगृह हवे असल्यास ते प्राथम्याने आरक्षित करणे आवश्यक राहील.

७) शासनाने वेळोवेळी केलेले नियम व अटी मधील बदल सदर नाटयगृहास बंधनकारक राहतील.

**२.** यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन (०१) (०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ या अर्थसंकल्पिय वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

**३.** जिल्हाधिकारी, गोंदिया यासाठी नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१०१९१३१०११९७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.10.22 15:36:52 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. जिल्हाधिकारी, गोंदिया.
२. मुख्य अधिकारी, गोंदिया नगरपरिषद, गोंदिया.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), दोन महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), दोन महाराष्ट्र, नागपूर.
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी / अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - यांना उपरोक्त शासन निर्णयामधील अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) वर तात्काळ वितरीत करण्यात यावी.
९. निवड नस्ती सां.का.१.